उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शिक्षणशास्त्र, शारीरिक शिक्षण व विधी अभ्यासक्रम चालविणाऱ्या शासकीय व अशासकीय अनुदानित संस्थांमध्ये प्रवेशासाठी केंद्र शासनाच्या The Rights of Persons with Disabilities Act, २०१६ च्या तरतुदीनुसार कार्यवाही करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## उच्च व तंत्र शिक्षण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१०१८/प्र.क्र.२०४/मशि-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १३ ऑगस्ट, २०१८.

**वाचा:-**

(१) The Rights of Persons with Disabilities Act, २०१६.

(२) आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.अकआ/प्र-७/मोफतशिक्षण/क-३१(२)/२०१७-१८/२८, दिनांक २०.६.२०१७.

(३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.उशिसं/मवि-१/RPWD Act/२०१६/२०१८/७०७२, दिनांक २० जून, २०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने The rights of persons with Disabilities Act, २०१६ हा अधिनियम दिनांक २८ डिसेंबर,२०१६ रोजी राजपत्रात प्रसिध्द केला आहे. या अधिनियमाच्या कलम ३२ मध्ये पुढीलप्रमाणे तरतूद आहे:-

१) All Government institutions of higher education and other higher education institutions receiving aid from the Government shall reserve not less than five percent seats for persons with benchmark disabilities.

२) The person with benchmark disabilities shall be given an upper age relaxation of five years for admission in institutions of higher education.

केंद्र शासनाच्या उक्त अधिनियमातील तरतुदीनुसार उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शिक्षणशास्त्र, शारीरिक शिक्षण व विधी अभ्यासक्रम चालविणाऱ्या शासकीय व अशासकीय अनुदानित संस्थांमध्ये प्रवेशासाठी लक्षणीय अपंगत्व असणाऱ्या व्यक्ती/विद्यार्थ्यांकरिता ५ टक्के इतक्या जागा राखीव ठेवणे आवश्यक आहे.

## शासन निर्णय:-

The Rights of Persons with Disabilities Act, २०१६ च्या कलम ३२ (१) मधील तरतुदीनुसार उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शिक्षणशास्त्र, शारीरिक शिक्षण व विधी अभ्यासक्रम चालविणाऱ्या शासकीय व अशासकीय अनुदानित संस्थांमध्ये प्रवेशासाठी लक्षणीय अपंगत्व असणाऱ्या व्यक्ती/विद्यार्थ्यांकरिता ५ टक्के इतक्या जागा राखीव ठेवण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. सदर निर्णयाची उच्च शिक्षण संचालनालय स्तरावरुन योग्य ती अंमलबजावणी करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८१३१५५४१८७७०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hariram V Parhate

Digitally signed by Hariram V Parhate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bfd656b321bf6c348564562d46cd2934b62b770484625206559a2c204e56cb8, serialNumber=d01f16685aedf1abc9cfd58347280b4c4cb8d304afd1d413884ef4d91aa1462d, cn=Hariram V Parhate
Date: 2018.08.13 15:57:00 +05'30'

**( ह. व्यं. पऱ्हाते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, ३०५, शासकीय तंत्रनिकेतन इमारत, खेरवाडी, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०० ०३२.
४. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, ८ वा मजला, न्यु एक्सलसिअर इमारत, ए.के.नायक मार्ग, फोर्ट, मुंबई - ४०० ००१
५. आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य.
७. कुलसचिव, सर्व अकृषी सार्वजनिक विद्यापीठे.
८. सर्व संबंधित संस्था/महाविद्यालये (उच्च शिक्षण संचालनालयामार्फत).
९. निवड नस्ती/मशि-२.